नागपूर महानगरपालिका
मोठ्या भांडवली स्वरुपाच्या प्रकल्पाकरिता आवश्यक निधी व विविध प्रकल्पासाठी महानगरपालिकेचा हिस्सा उपलब्ध करुन देण्याचे अनुषंगाने रु.२०० कोटीचे नवीन कर्ज मंजूर करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : नामपा-२०१८/प्र.क्र.६३/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०४ ऑगस्ट, २०१८

संदर्भ :- आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.१५५/प्रलेविअ/२०१८ दि. २८/०५/२०१८

**प्रस्तावना :-**

नागपूर महानगरपालिका महासभा ठराव क्र.२०५ दिनांक २७/०३/२०१८ अन्वये देण्यात आलेल्या मंजुरीनुसार, नागपूर महानगरपालिकेला मोठ्या भांडवली स्वरुपाच्या प्रकल्पाकरिता आवश्यक निधी व विविध प्रकल्पासाठी महानगरपालिकेचा हिस्सा उपलब्ध करुन देण्याच्या संदर्भात रु.२०० कोटी इतकी रक्कम राष्ट्रीयकृत बँकेमार्फत कर्ज रुपाने उभारण्यासाठी आयुक्त,नागपूर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये पाठविलेल्या प्रस्तावास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम १०९ नुसार ना-हरकत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेल्या आहे.

**शासन निर्णय :-**

अ) उपरोक्त अनुषंगाने आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची ना-हरकत देण्यात येत आहे.

ब) अटी व शर्ती :-

१. सदर कर्जाच्या परतफेडीसाठी राज्य शासन हमी देणार नाही.
२. कर्जा रक्कम ज्या प्रयोजनासाठी उभी करण्यात येणार आहे, तिचा त्याच प्रयोजनासाठी उपयोग करण्यात यावा.
३. सदर कर्जाच्या अटी व शर्ती संबंधित वित्तीय संस्था व नागपूर महानगरपालिका यांनी परस्पर संमतीने मान्य कराव्यात.

४. सदर कर्जाची परतफेड करणे महानगरपालिकेस शक्य आहे, याची आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी खात्री करावी.

५. या शासन निर्णयानुसार रु.२०० कोटीच्या मर्यादेत राष्ट्रीयकृत बँकेकडून कर्ज उभारणीस ना-हरकत देण्यात येत असली तरी कर्जाची प्रत्यक्ष उचल आवश्यकतेप्रमाणे करण्यात यावी.

६. या शासन निर्णयाच्या अनुषंगाने उभारण्यात येणाऱ्या कर्जाची व यापूर्वी महानगरपालिकेने घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी आवश्यक ते वित्तीय नियोजन आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी करावे.

७. सदर रकमेच्या परतफेडीचे हप्ते विहित कालावधीत संबंधीत वित्तीय संस्थेकडे जमा करण्याची जबाबदारी आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांची राहील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०८०४१४५६५५०९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2018.08.04 15:00:08 +05'30'

**(शशिकांत योगे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त, नागपूर महानगरपालिका,नागपूर
२) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.